सामान्य रूग्णालय, अहमदनगर येथे जिल्हा सुरक्षा मंडळामार्फ़त सुरक्षा सेवा पुरविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१८/प्र.क्र. ६३/ आरोग्य -३**
ए विंग़ , १० वा मजला, गो.ते. रूग्णालय संकूल इमारत
लो.टि. मार्ग , मुंबई- ४०० ००१
तारीख: २१ जून , २०१८

**वाचा -**

**१.सह संचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ) यांचे पत्र क्रमांकः संआसे/ कक्ष-३/ टे-५/ कं.सु.से./ जिशचि अहमदनगर/प्रशा. मं. ३४१-४२/१८, दि. १९.०१.२०१८ चे पत्र**

**प्रस्तावना -**

सामान्य रूग्णालय, अहमदनगर येथे जिल्हा सुरक्षा मंडळामार्फ़त सुरक्षा सेवा पुरविण्याच्या उपरोक्त पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

सामान्य रूग्णालय, अहमदनगर येथे जिल्हा सुरक्षा मंडळांमार्फ़त सुरक्षा सेवा पुरविण्याकरीता एका पाळीकरीता ३ सुरक्षा रक्षक याप्रामाणे तीन पाळींसाठी १५ सुरक्षा रक्षकांच्या वेतनाकरीता दरमहा रू. १२,५३७/- याप्रमाणे रू. २२,५६,६६०/- ( अक्षरी बावीस लाख छपन्न हजार सहाशे साठ फ़क्त ) इतक्या वार्षिक खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रस्तावाकरीता आवश्यक खर्च मागणी क्र. - आर-१, मुख्य लेखाशिर्ष २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ११०- रूग्णालये व दवाखाने, (०१) मुफ़सल रूग्णालये व दवाखाने (०१) (०१) मुफ़सल क्षेत्रातील अध्यापनेत्तर रूग्णालये व दवाखाने ( २२१० ०१४६) १३- कार्यालयीन खर्च लेखाशीर्षातंर्गत सन २०१८-१९ च्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र. ११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१२१२१५२०४९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.06.21 12:33:20 +05'30'

**(रो. दि. कदम- पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा परीक्षा) / (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त ( आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४. उप संचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
५. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रूग्णालय, अहमदनगर
६. जिल्हा आरोग्य अधिकारी , अहमदनगर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
८. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).